आंतरराष्ट्रीय स्पर्धेत सहभाग घेण्याऱ्या खेळाडूंना व्हिजा मिळण्याकरीता मदत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : क्रीडाधो-२०२५/प्र.क.५६/क्रीयुसे-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १७ एप्रिल, २०२५.

**वाचा :-** १) शासन पत्र क्र. संकीर्ण-३०२५/प्र.क्र.१५/क्रीयुसे-१, दि. १४.०२.२०२५.
२) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्र. क्रीयुसे/१०० दिवस कृआ/व्हीजा/ २०२४-२५/ का-६/, पत्र प्राप्त दि. २७ मार्च, २०२५.

**प्रस्तावना :**

आंतरराष्ट्रीय अधिकृत स्पर्धांमध्ये सहभागासाठी पात्र ठरलेल्या खेळाडुंना व्हीजा मिळण्यासाठी स्पोर्ट्स ऑथोरिटी ऑफ इंडिया (साई) यांचेकडून संबंधित दुतावासाकडे पत्रव्यवहार करण्यात येतो. तथापि, एखादा खेळाडू आमंत्रित स्पर्धेत सहभागी होतो किंवा प्रशिक्षणासाठी परदेशात जाऊ इच्छितो, तेव्हा त्यास व्हीजा मिळण्यासाठी वैयक्तिक स्तरावरून प्रयत्न करावे लागतात. अश्या वेळेस काही प्रकरणी खेळाडूंना व्हिजा मिळण्यास विलंब होऊ शकतो. मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली १०० दिवसांच्या कृती आराखड्याबाबत झालेल्या बैठकीमध्ये, आंतरराष्ट्रीय स्पर्धेत सहभाग घेण्या-या खेळाडूंना व्हिजा मिळण्याकरीता मदत करणे या मुद्द्याच्या अनुषंगाने चर्चा झाली. त्यानुषंगाने, संबंधित खेळाडूंना व्हिजा मिळण्याकरीता सहकार्य होण्यासाठी नोडल अधिकारी (समन्वयक) नियुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

आंतरराष्ट्रीय स्पर्धासाठी सहभागी होणाऱ्या राज्यातील खेळाडूंना व्हिजा मिळण्याकरीता सहाय्य करण्यासाठी विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक कल्याण, मुंबई यांची नोडल अधिकारी (समन्वयक) म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

सदर नोडल अधिकारी संबंधित खेळाडूस व्हिजा मिळण्याच्या अनुषंगाने आवश्यक ते मार्गदर्शन करतील. तसेच, काही विवक्षित (Specific) प्रकरणी अडचण असल्यास शासनाच्या राजशिष्टाचार विभागाच्या सहय्याने संबंधीत देशाच्या दुतावासाशी संपर्क/समन्वय साधून खेळाडूंना व्हिजा मिळण्यास सहकार्य करतील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२५०४१७१८२३४९९९२१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAVITA KETAN TONDE

Digitally signed by KAVITA KETAN TONDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=School Education Department,
2.5.4.20=d9d6cb2ca7858ab2922f2f069c1dcf0c59dbd6f04e8ac435f94b342b3c624ecc, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=a738d4711deb1f586dd1811780ba863704a1ea496ff9ec7d1b6a62b204ab4751, cn=KAVITA KETAN TONDE
Date: 2025.04.17 18:24:45 +05'30'

**( कविता तोंडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री, क्रीडा व युवक कल्याण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
५. मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा/विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई
६. सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक,
७. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
८. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
९. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, मुंबई विभाग.
११. निवड नस्ती (क्रीयुसे-३)